**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या अधिनस्त शिधावाटप व पुरवठा यंत्रणेतील गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांना पदोन्नती देणेस्तव निवडसूची तयार करण्यासाठी विभागीय पदोन्नती समिती गठीत करणेबाबत....**

# महाराष्ट्र शासन

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**शासन आदेश क्रमांक : आस्थाप्र-३११७/प्र.क्र.१२८/नापु-१५**

मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : २६ मे, २०१७.

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांक आस्थाप्र-११०९/प्र.क्र.२००/नापु-१५, दिनांक ३१ ऑगस्ट, २००९.

२) शासन निर्णय क्रमांक आस्थाप्र-२०१६/प्र.क्र.१२५/नापु-१५, दिनांक १ एप्रिल, २०१६.

## - :शा स न आ दे श :-

अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या अधिपत्याखाली नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई तसेच त्यांची अधिनस्त शिधावाटप कार्यालये व विभागीय स्तरावरील पुरवठा कार्यालये येतात.

२. नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई कार्यालयातील तसेच, अधिनस्त कार्यालयातील व विभागीय स्तरावरील क्षेत्रिय पुरवठा कार्यालयातील गट-अ व गट-ब संवर्गातील राजपत्रित अधिकाऱ्यांच्या सेवाप्रवेश नियमानुसार पदोन्नतीसाठी निवडसूची तयार करणेस्तव संदर्भाधीन शासन निर्णय क्र. १ व २ अधिक्रमित करुन खालीलप्रमाणे विभागीय पदोन्नती समिती गठीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

## नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई
## गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदोन्नतीस्तव
## विभागीय पदोन्नती समिती

| | | |
|---|---|---|
| १. | प्रधान सचिव<br>अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय | .... अध्यक्ष |
| २. | नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई | .... सदस्य |
| ३. | उप सचिव/ सह सचिव (नापु-१५)<br>अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय | .... सदस्य |
| ४. | अवर सचिव, (नापु-१५)<br>अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय | ....सदस्य सचिव |

## विभागीय स्तरावरील क्षेत्रिय पुरवठा कार्यालये
## गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदोन्नतीस्तव
## विभागीय पदोन्नती समिती

| | | |
|---|---|---|
| १. | प्रधान सचिव<br>अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय | .... अध्यक्ष |
| २. | सह सचिव/उप सचिव (नापु-१५)<br>अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय | .... सदस्य |
| ३. | अवर सचिव, (नापु-१५)<br>अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय | ....सदस्य सचिव |

३. सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय क्र.एसआरव्ही-१०७४/डी, दिनांक २८ जानेवारी, १९७५ नुसार विभागीय पदोन्नती समितीमध्ये मागासवर्गीय अधिकाऱ्याचा समावेश असणे आवश्यक आहे. सबब, सदर निदेशांचा विचार करुन, विभागीय पदोन्नती समितीतील सदस्यामध्ये मागासवर्गीय प्रतिनिधी नसल्यास, उपरोक्त दोन्हीही विभागीय पदोन्नती समितीमध्ये विभागातील कोणत्याही मागासवर्गीय प्रवर्गातील अवर सचिव यांचे समितीचे मागासवर्गीय सदस्य म्हणून अध्यक्षांच्या अनुमतीने समावेश करता येईल.

४. उपरोक्त विभागीय पदोन्नती समित्या या आदेशाच्या दिनांकापासून अंमलात येतील.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०१७०५२९११४९१८०९०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pradip Girdhar Chavan

Digitally signed by Pradip Girdhar Chavan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supply Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=46ad1667fce35440d37e8567cc278d78039b81154909a1162e319e905bd4e93b, serialNumber=f7e9a44534c5a6e0d2062d6f59ec690169fc00c18def69311f356364b1870337, cn=Pradip Girdhar Chavan
Date: 2017.05.29 11:57:20 +05'30'

**( प्र.गि. चव्हाण )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त/उपायुक्त (पुरवठा), कोकण/पुणे /नाशिक /औरंगाबाद / अमरावती/ नागपूर.
२. नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई.
३. समितीतील नियुक्त सदस्य/ सदस्य सचिव
४. सर्व जिल्हाधिकारी.
५. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी.
६. प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. निवडनस्ती/नापु-१५.